**खाजगी क्षेत्रातील जमीन सिंचन व इतर प्रकल्पांसाठी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी पध्दतीने जमीन विकत घेणेबाबत विशेष समिती गठीत करणेबाबत**

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१४/प्र.क्र.५७/का-१४३३

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २४-१२-२०१४.

**प्रस्तावना**

मा.मुख्यमंत्री महोदयांकडे विदर्भातील जिल्ह्यांच्या विकास आराखडयाबाबत झालेल्या चर्चेच्यावेळी पाटबंधारे तसेच इतर प्रकल्पांसाठी जमीन संपादन करतांना ब-याच अडचणी येतात, त्यामुळे प्रकल्पांचे काम सुरु होण्यास व पर्यायाने त्याचा लाभ लाभधारकांना मिळण्यास विलंब होतो. ही बाब प्रकर्षाने मा.मुख्यमंत्री महोदयांच्या निदर्शनास आणून देण्यात आली आहे. केंद्र शासनाचा नवीन भूसंपादन कायदान्वये मिळणारा मोबदला व त्यापूर्वी राज्य शासनामार्फत देण्यात येणारा मोबदला, तसेच शेतक-यांकडून थेट वाटाघाटीद्वारे जमीन खरेदी करताना मिळणारा मोबदला यांच्यामध्ये तफावत असल्याने, शेतकरी जमीन देण्याबाबत संभ्रमात आहेत. त्यामुळे प्रकल्पांसाठी जमीन मिळण्यास व पर्यायाने प्रकल्पांचे काम सुरु होण्यास विलंब होत आहे. त्यामुळे अपर मुख्य सचिव (नियोजन) यांच्या अध्यक्षतेखाली एक विशेष समिती गठीत करण्याबाबत मा.मुख्यमंत्री महोदयांच्या सूचना आहेत. या अनुषंगाने एक विशेष समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

**शासन निर्णय**

वरील पार्श्वभूमीच्या अनुषंगाने विविध प्रकल्पांसाठी जमीन मिळण्यास व पर्यायाने प्रकल्पांचे काम सुरु होण्यास विलंब होऊ नये म्हणून पुढीलप्रमाणे एक विशेष समिती गठीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**अ (समितीची रचना -:**

| | | |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव (नियोजन) | अध्यक्ष |
| २. | अपर मुख्य सचिव (वित्त) | सदस्य |
| ३. | प्रधान सचिव (जलसंपदा विभाग) | सदस्य |
| ४. | प्रधान सचिव (महसूल) | सदस्य |
| ५. | प्रधान सचिव (वने) | सदस्य |
| ६. | प्रधान सचिव-१ (नगर विकास) | सदस्य |
| ७. | सचिव ( बांधकामे) (सा.बां.वि.) | सदस्य |

**ब) सदर गठीत केलेल्या समितीस आवश्यकता भासल्यास प्रधान सचिव ( विधी व न्याय) व भूसंपादनाशी संबंधित असलेले अप्पर जिल्हाधिकारी / उप जिल्हाधिकारी यांनाही निमंत्रित सदस्य म्हणून बोलविता येईल.**

**क) समितीची कार्यकक्षा:-**

i) नवीन भूसंपादन व पुनर्वसन कायदा, २०१३ मध्ये खाजगी जमीन खरेदीवर कोणतेही बंधन नाही ही धारणा विधी व न्याय विभागाकडून पक्की करावी व या धोरणाच्या आधारे या समितीने विविध प्रकल्पांसाठी थेट जमीन खरेदी करण्यासाठी किमान खरेदी किंमत ठरविण्याचे सूत्र निश्चित करावे.

ii) जमीन खरेदी करण्याबाबत प्रकल्पांना लागणारी संपूर्ण जमीन एकाच पध्दतीने खरेदी करण्यात यावी. जेणेकरुन सर्व जमीन मालकांना एकाच समान सूत्रावर आधारित किंमत मिळेल. म्हणजेच सिंचन प्रकल्पातील बुडीत क्षेत्र व धरणाचे बांधकाम क्षेत्रासाठी आवश्यक सर्व जमीन थेट खरेदी किंवा भू-संपादनाद्वारे संपादित करणे उचित होईल याबाबत आवश्यक त्या शिफारशी कराव्यात.

२. सदर समितीची बैठक आयोजित करणे, तसेच त्या अनुषंगाने आवश्यक ती कार्यवाही कार्यासन १४३३ कडून करण्यात येईल. तसेच या कामकाजासाठी श्री.अ.शि.बेळगुद्री, उप सचिव, नियोजन विभाग हे मदत करतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२२४१६१४४१९७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Wahul Kiran V

Digitally signed by Wahul Kiran V
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Wahul Kiran V
Date: 2014.12.24 16:23:12 +05'30'

**(कि.व.वाहुल)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१.मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई /नागपूर
२. मा.मुख्यमंत्री याचे खाजगी सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, नागपूर /मुंबई
३. मा.मंत्री (वित्त व नियोजन, वने ) यांचे खजगी सचिव, नागपूर/ मुंबई
४. सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, नागपूर/ मुंबई
५. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्विय सहाय्यक, शिबीर कार्यालय, नागपूर /मुंबई
६. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव यांचे शिबीर कार्यालय, नागपूर /मुंबई
७. मा.अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्विय सहाय्यक,शिबीर कार्यालय, नागपूरम / मुंबई
८. सर्व सह सचिव/उप सचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, नियोजन व रोहयो प्रभाग, नागपूर
९. शिबीर कार्यालय नागपूर, निवडनस्ती, नागपूर /मुंबई.